**स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव कार्यक्रमाअंतर्गत दर्शनिका विभागाकडून स्टोरी टेलिंग ॲप तयार करण्याकरीता येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- दर्शनि-२०२३/प्र.क्र.११०/सां.का. २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : १२ जून, २०२३.

वाचा :- १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन पत्र क्रमांक संकीर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/ सां.का.४, दिनांक १७.०२.०२३
२. कार्यकारी संपादक व सचिव,दर्शनिका विभाग यांचे पत्र क्र.३८९, दिनांक १९ मे,२०२३

**प्रस्तावना-**

भारतीय स्वातंत्र्याला ७५ वर्षे पूर्ण होत असल्याच्या पार्श्वभूमीवर "स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" राज्यात साजरा होत आहे. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०५ डिसेंबर,२०२२ रोजी संपन्न झालेल्या कोअर समितीच्या बैठकीत गॅझेटियर व पुरवणी गॅझेटीयर मुद्रण व प्रकाशन उदा.चिरनेर सत्याग्रह जि.रायगड गॅझेटीयर तसेच माहिती जनतेस उपलब्ध करून देण्यासाठी मोबाईल ॲपची निर्मिती करण्यास्तव दर्शनिका विभागासाठी रू.८.०० कोटी (अक्षरी रूपये आठ कोटी फक्त) इतक्या रकमेस मान्यता देण्यात आली आहे.

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव कार्यक्रमाचा भाग म्हणून महाराष्ट्रातील हुतात्मे व हुतात्मा स्मारके यांची माहिती जनतेस मिळावी याकरीता स्टोरी टेलिंग ॲप तयार करण्यासाठी दर्शनिका विभागाने रु. १,४०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी ,चाळीस लक्ष फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. २ अन्वये शासनास सादर केला आहे. त्यानुसार सदर रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" या कार्यक्रमांतर्गत दर्शनिका विभागाकडून करण्यात येणाऱ्या स्टोरी टेलिंग ॲप निर्मितीसाठी येणाऱ्या अपेक्षित खर्च **रू.१,४०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी, चाळीस लक्ष फक्त)** इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. दर्शनिका विभागाने सदर ॲप निर्मितीसाठी आवश्यक ते निविदा प्रक्रिया राबवावी. तसेच, या ॲपच्या प्रसिध्दीसाठी आवश्यक ती कार्यवाही करावी.

२. उपरोक्त कार्यक्रमांवर होणारा खर्च मागणी क्रमांक "झेडडी-२, प्रधान लेखाशीर्ष २२०५ कला व संस्कृती (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम(कार्यक्रम) (२२०५ ३७३३), ५०- इतर खर्च" या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रवि. अ. प्र. २०१३ /प्र.क्र.३० /२०१३/ विनियम, भाग दोन, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-एक, उपविभाग तीन अ.क्र.४, परिच्छेद २७ (२) (अ) नुसार विभागाला देण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०६१२१६१२२८१३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.06.12 16:16:13 +05'30'

**( विद्या वाघमारे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई
७. उप सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. उप सचिव (व्यय-१५, वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
१२. अवर सचिव (सां.का. ४ ), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यकारी संपादक व सचिव,दर्शनिका विभाग,मुंबई.
१५. निवड नस्ती, सां.का.२.